**जवाहरलाल नेहरु पोर्ट ट्रस्ट (जे.एन.पी.टी.) प्रभावीत क्षेत्रासाठी उच्च स्तरीय समिती स्थापन करण्याबाबत....**

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सिआयडी-३३१५/प्र.क्र.१४१/नवि-१०

नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ४ जुलै, २०१५.

**वाचा :-**

**१) गृह विभागाचे पत्र क्र. : बैठक-१२१४/प्र.क्र.१८५/बंदरे-१, दि. २०.३.२०१५**

**प्रस्तावना :-**

जवाहरलाल नेहरू पोर्ट ट्रस्ट (जे.एन.पी.टी.) १९८९ मध्ये स्थापन करण्यात आली असून जगातील १०० मालवाहतुक बंदरांपैकी २४ क्रमांकाचे बंदर गणले जात आहे. आगामी काळामध्ये जे.एन.पी.टी.ची क्षमता ५ दशलक्ष TEU वरुन १० दशलक्ष TEU पर्यंत वाढविण्यात येणार आहे. या क्षमता वाढीमुळे या संपूर्ण क्षेत्रातील मुलभूत सुविधांवर ताण पडणार असून परिवहन व माल वाहतूकीमुळे वाहतुकीची दाटी होणार असून त्यामुळे जे.एन.पी.टी. बंदराच्या कामकाजामुळे प्रभावीत होणाऱ्या आजूबाजूच्या क्षेत्रामध्ये (अंदाजे २७४ चौ.किमी. क्षेत्र) नियोजन व सुव्यवस्थेची आवश्यकता आहे. तसेच, जे.एन.पी.टी. बंदराचा विस्तार करण्यात आला असून नवी मुंबई आंतरराष्ट्रीय विमातनळ व विशेष आर्थिक क्षेत्रामध्ये या संपूर्ण परिसरामध्ये मोठ्या प्रमाणावर आर्थिक उलाढाल होण्याची शक्यता आहे. जे.एन.पी.टी. प्रभावीत क्षेत्रातील विकास सुनियोजित व्हावा या दृष्टीने केंद्र व राज्य शासनाच्या अखत्यारीतील प्राधिकरणामध्ये सुयोग्य समन्वयाची आवश्यकता असून त्यासाठी या सर्व प्राधिकरणांची उच्च स्तरीय समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जवाहरलाल नेहरू पोर्ट ट्रस्ट बंदराच्या कामकाजामुळे प्रभावीत होणाऱ्या आजुबाजुच्या क्षेत्रामध्ये योग्य नियोजन व सनियंत्रणासाठी पुढीलप्रमाणे उच्च स्तरीय समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| उपाध्यक्ष आणि व्यवस्थापकीय संचालक, सिडको | - अध्यक्ष |
| अध्यक्ष, जवाहरलाल नेहरू पोर्ट ट्रस्ट | - सदस्य |
| मुख्य आयुक्त सीमाशुल्क मुंबई परिमंडळ-२ | - सदस्य |
| पोलीस आयुक्त, नवी मुंबई | - सदस्य |
| विभागीय आयुक्त, कोकण | - सदस्य |
| मुख्य दक्षता अधिकारी आणि विशेष कार्य अधिकारी, जेएनपीटीआयए, सिडको | - सदस्य |

| | |
|---|---|
| मु. म. व्यवस्थापक (तांत्रिक), RO भारतीय राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण | - सदस्य |
| प्रादेशिक व्यवस्थापक, ओएनजीसी, उरण प्लान्ट | - सदस्य |
| मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई | - सदस्य |
| अध्यक्ष, डीएफसीसी | - सदस्य |
| अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कं. लि. | - सदस्य |

जवाहरलाल नेहरू पोर्ट ट्रस्ट प्रभावीत क्षेत्रासाठी वरीलप्रमाणे गठीत करण्यात आलेल्या समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील :-

१. नियोजन, ग्राम नियोजन आणि परिवहन नियोजन यावर विचार विमर्श.
२. सुरक्षा आणि वाहतुक व्यवस्थापनासंबंधातील अडचणींवर निर्णय घेणे.
३. ग्रामीण विकासाकरीता सदस्य कंपन्यांच्या सीएसआर निधीचा वापर करणे.
४. भूसंपादनाशी संबंधीत मुद्यांवर विचार विमर्श करणे.
५. बहु अधिकरण कृतीवरील संबंधीत अन्य मुद्यांवर विचार विमर्श करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०४१५१८००६२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharam K Salimath

Digitally signed by Siddharam K Salimath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharam K Salimath
Date: 2015.07.06 17:00:45 +05'30'

**एस. के. सालीमठ**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
४. अप्पर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अप्पर मुख्य सचिव (परिवहन व बंदरे), मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (नगर विकास-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, सिडको
८. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सचिव (नगर विकास-२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१०. अध्यक्ष, जवाहरलाल नेहरू पोर्ट ट्रस्ट (जे.एन.पी.टी.)

११. मुख्य आयुक्त, सीमाशुल्क, मुंबई परिमंडळ-२

१२. पोलीस आयुक्त, नवी मुंबई

१३. विभागीय आयुक्त, कोकण

१४. मुख्य दक्षता अधिकारी आणि विशेष कार्य अधिकारी, जेएनपीटीआयए, सिडको

१५. मु.म.व्यवस्थापक (तांत्रिक), RO भारतील राष्ट्रीय राजमार्ग प्राधिकरण प्रादेशिक व्यवस्थापक, ओएनजीसी, उरण प्लान्ट

१६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई

१७.अध्यक्ष, डीएफसीसी

१८. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कं. लि.

१९. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई

२०.जनरल मॅनेजर, मध्य रेल्वे

२१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई

२२. व्यवस्थापकीय संचालक, नॅशनल हायवेज ऑथरीटी ऑफ इंडीया

२३. व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम

२४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई

२५. मुख्य आयुक्त सीमाशुल्क मुंबई परिमंडळ-२

२६. विभागीय आयुक्त, नागपूर

२७.जिल्हाधिकारी, वर्धा

२८.जिल्हाधिकारी, औरंगाबाद